लोकनेते स्व. गोपीनाथजी मुंडे, माजी उपमुख्यमंत्री, व माजी केंद्रीय मंत्री यांचे औरंगाबाद येथे स्मारक उभारण्यास मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्मारक-२०१५/प्र.क्र. ६८ /नवि- २४**

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक: २ जून ,२०१५

**वाचा :-** १. शासन निर्णय सा.प्र.वि. क्रमांक स्मारक-३११३/प्र.क्र.३०८/२९, दिनांक २१ ऑगस्ट २०१३

२. मा.मंत्री(महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २०.०५.२०१५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

३ .आयुक्त औरंगाबाद महानगरपालिका यांचे दिनांक ०४.०४.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये औरंगाबाद येथे लोकनेते स्व.गोपीनाथजी मुंडे यांचे भव्य स्मारक उभारण्याची घोषणा शासनाने केली आहे. या अनुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. आत्ता शासन याबाबत खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

i) मा. मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दिनांक २०.०५.२०१५ च्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार औरंगाबाद शहरातील न.भू.क्र. १३७८९ मधील ३०९६.०० चौ.मी. क्षेत्र नगर विकास विभागाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाने करावी.

ii) सदरहु प्रस्तावित स्मारक हे औरंगाबाद महानगरपालिकेच्या हद्दीमध्ये येत असल्याने प्रशासकीय विभाग म्हणून नगर विकास विभागाकडून याबाबत आवश्यक ती सर्व कार्यवाही करण्यात येईल.

iii) स्मारक उभारण्याच्या कामासाठी शहर व औद्योगिक विकास महामंडळ (सिडको) ही मुख्य कार्यान्वयीन यंत्रणा राहील. या अनुषंगाने सल्लागार नेमणे, आराखडा तयार करणे, स्मारकाच्या आराखडयास मा.मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखालील समितीची मान्यता घेणे व समितीने अंतिमत: मान्य केलेल्या आराखडयानुसार प्रत्यक्ष स्मारक उभारण्याचे काम पूर्ण करण्याचे काम शहर व औद्योगिक विकास महामंडळ (सिडको), यांचेमार्फते करण्यात येईल.

iv) **स्मारकाचा आराखडा निश्चित करण्यासाठी शासन स्तरावर मा.मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात येत आहे, व या समितीची रचना खालील प्रमाणे राहील.**

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | मा.श्री.एकनाथजी खडसे, मंत्री, महसूल,मदत कार्य व पुनर्वसन,भूकंप पुनर्वसन,अल्पसंख्याक विकास आणि वक्फ, कृषि व फलोत्पादन, पशुसंवर्धन, दुग्धविकास आणि मत्स्यव्यवसाय, राज्य उत्पादन शुल्क | अध्यक्ष |

| | | |
|---|---|---|
| २ | मा. मंत्री (पर्यावरण) तथा पालकमंत्री, औरंगाबाद | सदस्य |
| ३ | मा.श्रीमती. पंकजा मुंडे-पालवे, मंत्री, ग्राम विकास, महिला व बालकल्याण | सदस्य |
| ४ | मा.श्री.विनोद तावडे, मंत्री, शालेय शिक्षण | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (१) नगर विकास विभाग | सदस्य |
| ६ | सचिव (२),नगर विकास विभाग | सदस्य |
| ७ | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | सदस्य |
| ८ | जिल्हाधिकारी, औरंगाबाद | सदस्य सचिव |
| ९ | आयुक्त,औरंगाबाद महानगरपालिका | सदस्य |
| १० | मुख्य प्रशासक (नवी शहरे) सिडको, औरंगाबाद | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.**

१) सिडको या कार्यान्वित यंत्रणेने तयार केलेले संकल्प चित्र व आराखडे यास अंतिम मान्यता देणे.

२) स्मारकाच्या बांधकामाचा वेळोवेळी आढावा घेणे.

३) स्मारकाच्या कामाचा दर्जा राखण्यासाठी मार्गदर्शन व शिफारस करणे.

**v) प्रस्तावित स्मारकाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली एक सनियंत्रण समिती स्थापन करण्यात येत आहे. या समितीची रचना व कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.**

| अक्र. | नाम व पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी,औरंगाबाद | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका | सदस्य |
| ३ | मुख्य प्रशासक (नवी शहरे) सिडको, औरंगाबाद | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील.**

१. समितीने लोकनेते स्व. गोपीनाथजी मुंडे यांचे औरंगाबाद शहरातील न.भू.क्र. १३७८९ येथे स्मारक उभारण्याच्या अनुषंगाने सुयोग्य जागेची निवड करुन त्यावर उभारावयाच्या स्मारकाचे संकल्प चित्र व आराखडे तयार करणे.

२. या स्मारका साठी आवश्यकतेनुसार वास्तु विशारद/प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती करणे.

३. स्मारकाच्या अंदाजपत्रकांना सार्वजनिक बांधकाम विभाग/ सिडको यांचेकडून तांत्रिक मान्यता घेऊन आराखडे व अंदाजपत्रकांना विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन शासनाची प्रशासकीय मान्यता घेणे.

४. स्मारकाच्या आराखडे व अंदाजपत्रकास शासनाकडून प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर आवश्यक त्या निधीची शासनाकडे मागणी करणे.

५. स्मारकाच्या बांधकामासाठी शासन निर्णयानुसार निवीदा मागविणे व अंतीम करणे. शासकिय नियमानुसार कंत्राटदाराची नियुक्ती करणे, बांधकामाचा वेळोवेळी आढावा घेऊन प्रकल्प पूर्णत्वास नेणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१६१६३२०३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Lokhande

Digitally signed by Govind Lokhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ce89373fc7a728d2cdfa1a26c08e1e3f7e3f4f232c1bd146794d3cc3034d5701, cn=Govind Lokhande
Date: 2015.06.02 16:17:39 +05'30'

**( गो.आ.लोखंडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी,औरंगाबाद.
२. आयुक्त ,औरंगाबाद महानगरपालिका.
३. मुख्य प्रशासक (नवी शहरे) सिडको, औरंगाबाद